मुंबई मध्यवर्ती कारागृहाच्या प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलाखत कक्ष बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीएलडी-२००३/प्र.क्र. ३३७/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. १७ फेब्रुवारी, २००४

वाचा :- १) शासन निर्णय गृह विभाग क्र. एमआयएस-०११६/ १६(६४)/पीआरएस-२, दि. ७ डिसेंबर, १९९८

२) कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र. बीएलडी/मुलाखतखोली/८२७/कक्ष-३ /१२, दि. १.१.२००४

३) शासन पत्र गृह विभाग क्र. एमआयएस-२००३/ प्र.क्र.१६२/पीआरएस-२, दि. ३ डिसेंबर, २००३

प्रस्तावना :- मुंबई मध्यवर्ती कारागृहामध्ये क्षमतेपेक्षा जास्त बंदी असून तेथे बंद्यांची गर्दी झालेली आहे. यामुळे बंद्यांना देण्यात येणाऱ्या सोयीसुविधेवर त्याचा ताण पडत असून, त्याचा परिणाम कारागृह प्रशासन व सुरक्षा व्यवस्थेवर होत आहे. कारागृहातील मुलाखत कक्ष वाढवून बंद्यांना जास्तीत जास्त सुविधा उपलब्ध करुन देणेबाबत मा. लोकआयुक्त यांनी निर्देश दिलेले आहेत. तसेच या कारागृहातील बंद्यांना न्यायालयात वैद्यकीय उपचारासाठी ने-आण करणे, नवीन बंदी प्रवेश इत्यादी कारणामुळे कारागृहाच्या प्रवेशद्वारावर त्याचा ताण पडत असून त्यामुळे कारागृह सुरक्षा व्यवस्थेवर त्याचा परिणाम होत आहे. त्यानुषंगाने कारागृह महानिरीक्षक, पुणे यांनी मुंबई मध्यवर्ती कारागृहातील मुलाखत कक्ष बांधणे व प्रवेश द्वाराची दुरुस्ती करणेसाठी अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी प्रमाणित केलेल्या रु. ५,९९,४३४/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विनंती केलेली आहे.

शासन निर्णय :- मुंबई मध्यवर्ती कारागृहामध्ये दोन टेहाळणी मनोऱ्याच्या बांधकामासाठी विभागाच्या दर नमुद दि. ७ डिसेंबर, १९९८ च्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता दिलेली असून या कामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या आराखड्यात केलेला आहे व त्यास निधीचे वितरण कारागृह महानिरीक्षणालय, पुणे यांचेकडून त्याच्या क्रमांक बीजीटी २००२-२००३/९९४६/कक्ष-५, दिनांक ३०.९.२००३ च्या आदेशान्वये संबंधित कारागृहाकडे वितरीत करण्यात आलेले आहे. तथापि सदरचे बांधकाम करणे शक्य नसल्याने तसेच सध्या आवश्यकता नसल्याने हे काम रद्द करुन त्याबाबतचा निधी आता नव्याने सुचविलेल्या मुंबई मध्यवर्ती कारागृहातील प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलाखत कक्षाचे बांधकामास देण्याबाबत व या कामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा या योजनेतर योजनेच्या आराखड्यात करण्यासंदर्भात शासन स्तरावर कारागृह

उप महानिरीक्षक दक्षिण विभाग, मुंबई व सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिकारी यांचेसमवेत प्रधान सचिव (तुरुंग) याच्या अध्यक्षतेखाली दि. २६ नोव्हेंबर, २००३ रोजी झालेल्या आढावा बैठकीत मुंबई मध्यवर्ती कारागृहातील दोन टेहाळणी मनोऱ्याऐवजी मुंबई मध्यवर्ती कारागृहातील मुख्य प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलाखतकक्षाचे बांधकाम करण्यासाठीचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने कारागृह महानिरीक्षणालय, पुणे यांनी हा निधी मुंबई मध्यवर्ती कारागृहाच्या प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलखत कक्ष बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त झालेल्या रुपये ५,९९,४३४/- इतक्या खर्चाच्या प्रस्तावास मंजुरी देण्याबाबत उपरोक्त दि. १.१.२००४ च्या पत्राद्वारे शासनास विनंती केली आहे.

२. मुंबई मध्यवर्ती कारागृहाच्या प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलाखत कक्ष बांधणे या कामाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा या योजनेतर योजनेच्या आराखड्यात करण्यात येत असून उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे बंद्यांना होणारी सोयीसुविधेतील वाढ तसेच मा. लोकआयुक्त, मुंबई यांनी मुलाखतकक्षाच्या वाढीबाबत दिलेले निर्देश या बाबींचा काळजीपूर्वक विचार करुन शासन या कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने पाठविलेल्या रु. ५,९९,४३४/- (रुपये पाच लाख, नव्याण्णव हजार चारशे चौतीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देत आहे. विभागाने यापूर्वी मुंबई मध्यवर्ती कारागृहात दोन टेहाळणी मनोऱ्याच्या बांधकामासाठी वर नमूद ७ डिसेंबर, १९९८ च्या शासन निर्णयाद्वारे दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत असून, त्यासाठी कारागृह महानिरीक्षणालयाने त्यांच्या दि. ३०.९.२००३ च्या आदेशाद्वारे दिलेला निधी वर नमूद प्रवेशद्वाराची दुरुस्ती व मुलाखत कक्ष बांधणे या अत्यावश्यक कामासाठी खर्चाच्या मर्यादेत उपलब्ध करुन देण्यात यावा.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००)(०९), कारागृह सुधारणा योजना (कें.पु)(योजनेतर)(२०५६-०९८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर ८४/२००४/व्यय-८, दि. ३.२.२००४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने व मंजुरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सही)

(र. ना. माळी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

D:\Yogesh\2004\february\gurv-2.26

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.

अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई

कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई

उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, दक्षिण उप विभाग (सा.बां.), मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.

महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय, मुंबई-३२.

सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-२), मंत्रालय, मुंबई-३२.

अवर सचिव (पीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

निवड नस्ती - पीआरएस-२.